**महाज्योती ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती, नागपूर संस्थेकरीता सन २०२३- २४ या आर्थिक वर्षाकरीता ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) अंतर्गत मंजूर करण्यात आलेला निधी वितरित करण्याबाबत......**

**महाराष्ट्र शासन**
**इतर मागास बहुजन कल्याण विभाग**
**शासन ज्ञापन क्र. महाज्ये-२०२३/प्र.क्र.५७/संस्था**

इतर मागास बहुजन कल्याण विभाग ,
मादाम कामा रोड, हुतात्मा राज गुरु चौक,
मंत्रालय मुंबई-३२
दि.१७ ऑगस्ट, २०२३

**संदर्भ :-** १. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. अर्थस- २०२३/प्र.क्र. ४०/अर्थ-३, दि. १२/०४/२०२३
२. शासन ज्ञापन क्र. महाज्ये-२०२३/प्र.क्र.५७/संस्था, दि. २१/०६/२०२३

**ज्ञापन :-** सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती, नागपूर या संस्थेकरीता ३१ सहायक अनुदाने (वेतनेत्तर) यासाठी रु. ५०.०० कोटी इतका निधी अर्थसंकल्पीत करण्यात आलेला आहे.

२. वित्त विभागाने संदर्भाधीन दि. १२/०४/२०२३ शासन परिपत्रकान्वये २० टक्के निधी अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर उपलब्ध करून दिलेला आहे. त्यानुसार संदर्भ क्र. २ अन्वये रु.५.०० कोटी इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. उर्वरित रु. ५.०० कोटी ( अक्षरी रुपये पाच कोटी फक्त) इतका निधी वितरित करण्यास याद्वारे शासन मान्यता देण्यात येत आहे.
३. उक्त निधी खर्च करण्यासाठी व्यवस्थापकीय संचालक, महाज्योती नागपूर हे नियंत्रक अधिकारी राहतील. सदरची रक्कम आहरित करण्यासाठी प्रादेशिक उपसंचालक, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, नागपूर यांना आहरण संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्च सन २०२३-२४ मधील प्राप्त तरतुदीतून, मागणी क्र. झेडजी-३, २२२५- अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्ग व अल्पसंख्याक यांचे कल्याण, ०३, मागासवर्गीयांचे कल्याण, १०२- आर्थिक विकास, ०१- विमुक्त जाती भटक्या जमाती, इतर मागास प्रवर्ग कल्याण, (०१) (०९) महात्मा ज्योतीबा फुले संशोधन व प्रशिक्षण संस्था (महाज्योती), (२२२५ एफ ४९७), ३१ सहायक अनुदान (वेतनेत्तर) या लेखाशीर्षाखाली करण्यात यावा.

५. वित्तीय नियमावली व महाराष्ट्र अर्थ नियमावली पुस्तिकानुसार वित्त विभागाने निर्गमित केलेल्या अटी व शर्तीनुसार सदर निधी खर्च करताना कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्याची, तसेच सदर खर्च केल्यानंतर उपयोगिता प्रमाणपत्र (Utilisation) Certificate) वेळोवेळी शासनास सादर करण्याची जबाबदारी ही व्यवस्थापकीय संचालक, महाज्योती यांची राहील.

६. सदर ज्ञापन वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि. १२/०४/२०२३ शासन परिपत्रकान्वये दिलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा २०२३०८२८१५०१२७८४३४ संकेताक असा आहे. हा शासन आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by DINESH ROHIDAS CHAVAN
Date: 2023.08.28 15:03:52 +05'30'

**( दिनेश चव्हाण )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत, माहिती व आवश्यक कार्यवाहीसाठी अग्रेषित:-**

१) मा. राज्यपालांचे सचिव, मलबार हिल, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अप्पर मुख्य सचिव, मुंबई
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मुंबई
४)मा. मंत्री/ इतर मागास बहुजन कल्याण विभाग, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५) मा. मुख्य सचिव यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
६) सर्व मंत्रालयीन विभागांचे अमुस/प्रधान सचिव / सचिव, मंत्रालय, मुंबई
७) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- १ / २ महाराष्ट्र, मुंबई/ नागपूर
८) व्यवस्थापकीय संचालक, महाज्योती, नागपूर
९) सचिव, इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई यांचे स्वीय सहाय्यक
१०) उप सचिव (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग, मंत्रालय, मुंबई
११) लेखाधिकारी (रोखशाखा) / कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), इतर मागास बहुजन कल्याण विभाग,मंत्रालय मुंबई
१२) निवडनस्ती.